**भारतीय स्वातंत्र्य लढयात स्फुर्ती, प्रेरणा निर्माण करणारे "वंदे मातरम्" या राष्ट्रीय गीताच्या १५०व्या वर्षानिमित्त विशेष सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२५/प्र.क्र.२२(ई.नं.१०५४१७३)/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२५

**संदर्भ :-** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२५/ प्र.क्र.२२(ई.नं.१०५४१७३)/सां.का.४, दि. २७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

विविध सांस्कृतिक कार्यक्रम व उपक्रमांचे आयोजन विभागामार्फत करण्यात येते. भारतीय स्वातंत्र्य लढ्यात ज्या गीताने चैतन्य आणले होते ते गीत म्हणजे वंदे मातरम्! बंकिमचंद्र चटर्जी यांच्या "आनंदमठ" या कादंबरीतील "वंदे मातरम" हे गीत क्रांतिकारक व सर्वसामान्यांच्या गळ्यातील ताईत होते. "वंदे मातरम" फक्त नारा किंवा गीत नव्हते तर स्वातंत्र्य लढ्यातील तो एक मंत्र होता. भारताचे स्वातंत्र्य झाल्यानंतर १९५० मध्ये या गीताला "राष्ट्रीय गीत" असा दर्जा देण्यात आला. जाज्वल्य व स्फूर्तीचे स्फुल्लिंग चेतवणाऱ्या या गीताचा इतिहास व ओळख सर्वांना व्हावी या उद्देशाने एका भव्य सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येणार आहे. त्यानुषंगाने "वंदे मातरम" या राष्ट्रीय गीताच्या १५०व्या वर्षानिमित्त विशेष सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन खर्चास उपर्निर्दिष्ट सदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता सदर कार्यक्रम आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात भारतीय स्वातंत्र्य लढ्यात स्फुर्ती, प्रेरणा निर्माण करणारे "वंदे मातरम" या राष्ट्रीय गीताच्या १५०व्या वर्षानिमित्त विशेष सांस्कृतिक कार्यक्रम आयोजन करण्यास येणाऱ्या अंदाजित रुपये ४,९०,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी नव्वद लक्ष फक्त) इतक्या खर्चाच्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३.          सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०४.          सदर प्रकरणी मंजूर करण्यात आलेली रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता लेखा अधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या रकमेची देयके संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयाच्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा (VPDA) द्वारे आहरित करण्यासाठी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथे सादर करुन विहित प्रणालीद्वारे संबंधितांना वितरीत करावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

०५.          सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व दि. १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६.          सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३३१२१५७१४५५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.31 21:58:06 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२. निवड नस्ती, सां.का.४